**मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाच्या अनुषंगाने कांदळवन (Mangrove) क्षेत्राच्या संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापनासाठी आवश्यक असणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या ३७ पदांना मुदतवाढ देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१७/प्र.क्र.११०/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०१७.

पहा :-

१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१०/प्र.क्र.९२/फ-१; दिनांक १ नोव्हेंबर, २०११.
१) शासन निर्णय क्रमांक एस-१०/२०१६/प्र.क्र.१/फ-३, दिनांक २४.०२.२०१६ व दिनांक ४.१०.२०१६.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०.२.२०१७.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.५१/१६-१७/२०६५; दिनांक ३१.०१.२०१७ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

रिट याचिका क्र. ३२४६/२००४ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक ६.१०.२००५ रोजी पारित केलेल्या आदेशानुसार कांदळवन (Mangrove) क्षेत्राचे संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापन करणे आवश्यक आहे. याकरिता क्षेत्रिय पातळीवर पुरेसा कर्मचारी वर्ग उपलब्ध नव्हता. या बाबी विचारात घेऊन शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१०/प्र.क्र.९२/फ-१, दिनांक १ नोव्हेंबर, २०११ अन्वये अधिकारी / कर्मचारी यांची एकूण ३७ अस्थायी पदे निर्माण करण्यात आली.

२. महाराष्ट्रातील ७२० कि.मी. तटीय क्षेत्रातील कांदळवनाचे संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापन करण्यासाठी सदरची योजनेतर व योजनेखालील ३७ अस्थायी पदे पुढे देखील चालू ठेवणे आवश्यक आहे. सदर ३७ अस्थायी पदे दिनांक २८.२.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने संदर्भ क्रमांक २ अन्वये यापूर्वी मान्यता दिली होती. सदर ३७ अस्थायी पदांना आता दिनांक २८.२.२०१८ पर्यंत चालू ठेवण्यासाठी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्ताव सादर केला आहे.

३. वित्त विभागाच्या दिनांक ११.०२.२०१६ च्या शासन निर्णयानुसार सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त सर्व अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०१७ ते दि. ३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहे. यास्तव **प्रपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार ३७ अस्थायी पदे **दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत** चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर ३७ अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधीक कालावधीसाठी रिक्त नाहीत.

ब) प्रस्तावातील पदे आकृतीबंध मंजूर झाल्यानंतर दिनांक १.११.२०११ च्या शासन निर्णयान्वये निर्माण झाली आहेत, त्यामुळे आकृतिबंधातील २५०२५ पदांमध्ये सदरची पदे अंतर्भूत असणार नाहीत. तरी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर पदांचा आढावा घेऊन सुधारित आकृतीबंधास कोणत्याही परिस्थितीत **३० एप्रिल, २०१७ अखेर पर्यंत** उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता प्राप्त होईल, याची दक्षता घेतील. तसे न केल्यास मुदतवाढीअभावी सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा प्रश्न उध्दवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी त्यांची राहील.

४. प्रस्तुत प्रकरणी मॅंग्रोव्ह व्यवस्थापन, संरक्षण व संवर्धनासाठी निर्माण करण्यात आलेले पद जेव्हा (Out Sourcing) बाह्य स्त्रोताद्वारे भरले जातील तेव्हा सदर आस्थापनेवरील येणारा मानधनावरील खर्च २४०६ - वनीकरण व वन्यजीवन (२४०६ ७२२३), १०१ (११) वनसंधारण व विकास, (११) (३२) १३ केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशींनुसार वनांचे व्यवस्थापन याकरिता केंद्र सहाय्य (दत्तमत) (२४०६ ७२२३) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून

भागविण्यात यावा. मात्र ज्यावेळी सदर पदे नियमित अधिकारी / कर्मचाऱ्यांमार्फत भरली जातील त्या वेळी त्यांचे वेतन व भत्ते मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) १०१ वनसंरक्षण व विकास (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) या लेखाशिर्षामधून अदा करण्यात यावे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०.२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयास अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२३१६०६३५३०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Bhaskar Kacharu Bansode

Digitally signed by Bhaskar Kacharu Bansode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4449e6ba807d428f12cdf5421c1407 3d9bbfe99f719cded6503ad69d99320695, cn=Bhaskar Kacharu Bansode
Date: 2017.02.23 16:12:46 +05'30'

( भा.क.बनसोडे )
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई.
६) अपर मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
७) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे / कोल्हापूर.
८) सर्व संबंधित उप वनसंरक्षक.
९) फ-४ / फ-८ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**प्रपत्र-अ**

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहा. वनसंरक्षक | १ |
| २ | वनक्षेत्रपाल | ४ |
| ३ | वनक्षेत्र सर्वेक्षक | १ |
| ४ | सर्वेक्षक | २ |
| ५ | वनरक्षक | १२ |
| ६ | लघुलेखक (कनिष्ठ श्रेणी) | १ |
| ७ | मुख्य लेखापाल | १ |
| ८ | लेखापाल | ४ |
| ९ | लिपिक | ५ |
| १० | नौकाचालक | २ |
| ११ | डिंघी चालक | २ |
| १२ | खलाशी | २ |
| **एकूण** | | **३७** |